**२५०० मे.टन प्रतिदिन गाळप क्षमतेच्या साखर कारखान्यांची सध्या असलेली प्रमाणित किंमत (Normative Cost) रु.४८.०० कोटी असलेली किंमत सुधारीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन,**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक ससाका-२०१६/प्र.क्र.१७६/३-स,**
शिबीर कार्यालय, नागपूर.
दिनांक : १८ जुलै, २०१८.

<u>वाचा:</u>- १. शासन निर्णय क्रमांक:ससाका-२६०१/प्रक्र.२२१/३-स, दिनांक १८.०६.२००२.
२. शासन निर्णय क्रमांक:ससाका-२०१६/प्रक्र.२१५/३-स, दिनांक १६.०४.२०१८.
३. साखर आयुक्त, पुणे यांचे क्रमांक साआ/उपप कक्ष-१२/सह्याद्री ससाका धामोड/आ.प्र.मंजूरी/१८, दि.२८.०३.२०१८ रोजीचे पत्र.
४. राष्ट्रीय सहकारी साखर संघ, नवी दिल्ली यांचे दिनांक २०.०६.२०१८ रोजीचे पत्र.
५. वरीष्ठ उपाध्यक्ष, मिटकॉन यांचे दिनांक २१.०६.२०१८ रोजीचे पत्र.
६. वित्तीय सल्लागार, वसंतदादा साखर इंन्स्टिट्यूट, मांजरी, पुणे यांचे दि.२१.०६.२०१८ रोजीचे पत्र.
७. क्रमांक: बैठक-२०१८/प्रक्र. १/३-स, (शिकाना), दि.३०.०६.२०१८.
८. क्रमांक:ससाका-२०१६/प्र.क्र.१७६/३-स, दिनांक ०९.०७.२०१८.

**<u>प्रस्तावना :-</u>**

शासन निर्णय दि.१८/६/२००२ नुसार प्रतिदिन २५०० मे.टन गाळप क्षमतेच्या सहकारी साखर कारखान्याची प्रमाणित किंमत रुपये ४८००.०० लाख निश्चित करण्यास शासनाने मान्यता देऊन, या प्रमाणित किंमतीच्या आकृतीबंधानुसार सहकारी साखर कारखान्यांना अर्थ सहाय्य करण्याचा निर्णय घेतला होता. सदर शासन निर्णय निर्गमित होऊन १६ वर्षापेक्षा जास्त कालावधी झालेला असून, शासन धोरणानुसार सदर क्षमतेच्या कारखान्याच्या प्रमाणित किंमतीत सुधारणा करण्याची आवश्यकता आहे.

यास्तव, सदर शासन निर्णयात २५०० मे.टन गाळप क्षमता असलेल्या सहकारी साखर कारखाना उभारणी करण्याच्या संदर्भात प्रमाणित किंमतीत सुधारणा करण्यासाठी शासन निर्णय दिनांक १६.०४.२०१८ अन्वये खालीलप्रमाणे समिती नियुक्त करण्यात आलेली आहे:-

| | |
|---|---|
| १) मंत्री(सहकार) | -अध्यक्ष |
| २) अपर मुख्य सचिव | -सदस्य |
| ३) साखर आयुक्त, पुणे | -सदस्य |
| ४) वसंतदादा शुगर इंन्स्टिट्युट, पुणे प्रतिनिधी | -सदस्य |
| ५) नॅशनल फेडरेशन ऑफ शुगर फॅक्टरी, नवी दिल्ली प्रतिनिधी | -सदस्य |
| ६) श्री.एस.सी.नातू, वरीष्ठ उपाध्यक्ष, मिटकॉन, पुणे | -सदस्य |
| ७) संबंधित सहसंचालक(साखर) साखर आयुक्तालय, पुणे | -सदस्य सचिव. |

२५०० मे.टन प्रतिदिन गाळप क्षमतेच्या साखर कारखान्यांच्या सध्या असलेल्या प्रमाणित किंमतीमध्ये वाढ करण्याची गरज विचारात घेवून साखर आयुक्त, पुणे यांच्या दिनांक २१.०६.२०१८ रोजी प्राप्त झालेल्या अहवालाच्या अनुषंगाने दिनांक ०४.०७.२०१८ रोजी यासंदर्भात मा.मंत्री (सहकार) यांच्या

अध्यक्षतेखाली समितीची बैठक आयोजित करण्यात आली होती. समितीच्या बैठकीमध्ये कारखान्याच्या उभारणीमधील बाबनिहाय तपशिलाबाबत चर्चा झाली. त्यामध्ये नॅशनल फेडरेशन ऑफ को-ऑप शुगर इंडस्ट्रीज लि., नवी दिल्ली आणि वसंतदादा साखर संस्था, पुणे तसेच मिटकॉन, पुणे या संस्थांच्या प्रतिनिधी यांनी यंत्रसामुग्री, स्थापत्य, जमीन, कर आणि इतर अनुषंगिक खर्च यांचा विचार करुन रु.४८.०० कोटी हे कमी असल्याबाबतचे प्रतिपादन केले.

शासन निर्णय दि.१८/६/२००२ नुसार प्रतिदिन २५०० मे.टन गाळप क्षमतेच्या सहकारी साखर कारखान्याची प्रमाणित किंमत रुपये ४८००.०० लाख निश्चित करण्यात आली होती. सदर शासन निर्णय निर्गमित होवून १६ वर्षाचा कालावधी लोटल्याने सदर निर्णयातील प्रमाणित किंमतीत सुधारणा करण्याच्या अनुषंगाने गठीत मा.मंत्री समिती यांनी साखर आयुक्त, पुणे यांनी सादर केलेला दिनांक २१.०६.२०१८ रोजीचा अहवाल विचारात घेतला. सदर पत्रानुसार राष्ट्रीय सहकारी साखर कारखाना संघ म., नवी दिल्ली यांनी निश्चित केलेल्या प्रमाणित किंमतीस मिटकॉन, पुणे आणि वसंतदादा साखर संस्था, पुणे यांनी सहमती दर्शविली आहे. त्यानुसार सदर किंमतीमध्ये वाढ करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

शासन निर्णय दि.१८/६/२००२ नुसार प्रतिदिन २५०० मे.टन गाळप क्षमतेच्या सहकारी साखर कारखान्याची प्रमाणित किंमत रुपये ४८००.०० लाख निश्चित करण्यात आली होती. सदर शासन निर्णय निर्गमित होवून १६ वर्षाचा कालावधी लोटल्याने सदर निर्णयातील प्रमाणित किंमतीत सुधारणा करण्याच्या अनुषंगाने गठीत मा.मंत्री समिती यांनी साखर आयुक्त, पुणे यांनी सादर केलेला दिनांक २१.०६.२०१८ रोजीचा अहवाल विचारात घेतला. राष्ट्रीय सहकारी साखर कारखाना संघ म., नवी दिल्ली यांनी तयार केलेल्या कारखान्याच्या सविस्तर प्रकल्प अहवालानुसार २५०० मे.टन क्षमतेच्या प्रकल्पाची अंदाजित किंमत रुपये ११५००.०० लाख इतकी दर्शविलेली आहे. सदर प्रमाणित किंमतीस मिटकॉन, पुणे व वसंतदादा साखर संस्था, पुणे यांनी सहमती दर्शविली आहे.

२५०० मे.टन प्रतिदिन गाळप क्षमतेच्या साखर कारखान्यांची सध्या असलेली प्रमाणित किंमत (Normative Cost) रु.४८.०० कोटीमध्ये झालेल्या वाढीची कारणे मिटकॉन, पुणे, वसंतदादा साखर संस्था, पुणे व नॅशनल फेडरेशन, नवी दिल्ली यांचे मतानुसार खालीलप्रमाणे आहेत.

- गेल्या १६ वर्षात जमिनीच्या किंमतीत झालेली वाढ.
- सिमेंट, स्टील, इंधन दर व मजूरी दरात गेल्या १६ वर्षात झालेली वाढ.
- वाफ व वीज बचतीसाठी कार्यक्षम तंत्र सुधारणा व त्यानुसारची अद्ययावत व स्वयंचलीत यंत्रसामुग्रीच्या किंमतीमध्ये झालेली वाढ.
- पाण्याचा कमी वापर व पाणी पुनर्वापर यासाठीच्या यंत्रसामुग्री प्रणालीमध्ये झालेली वाढ.

वरील कारणांमुळे प्रकल्प खर्च विचारात घेता बाब निहाय खर्च व टक्केवारी खालील तक्त्यात दर्शविलेली आहे.

| S.No | Descripition | Rs. In Lakhs |
|---|---|---|
| १ | Land & site Development (2% of Project Cost) | 230.00 |
| २ | Civil Works Including Taxes (20% of Project Cost) | 2300.00 |
| ३ | Plant & Machinery Including Taxes & Duties (65% of Project Cost) | 7475.00 |

| | | |
|---|---|---|
| ४ | Pre-operative Expenses to be Capitalised (10 %of Project Cost) | 1150.00 |
| ५ | Contingency (3% of Project Cost) | 345.00 |
| | Grand Total | 11500.00 |

**०३.** उपरोक्त प्रमाणे रु.११५००.०० लाख इतकी निश्चित करण्यात आलेली प्रमाणित किंमतीस खालील अटी व शर्तीनुसार मान्यता दर्शविण्यात येत आहे:-

१) एकूण रु.११५००.०० लाख प्रकल्प किंमत विचारात घेता निधी उभारणीचे स्त्रोत (Means of Finance) कारखाना ३०% आणि वित्तीय संस्था ७०% हिस्सा राहील. मात्र वित्तीय संस्थांच्या निकषांनुसार निधी उभारणीचे स्त्रोतामध्ये फेरफार करण्याचे स्वातंत्र कारखान्यांना राहील.

२) सहकारी साखर कारखाना उभारणीसाठी शासन आता अथवा भविष्यात कोणत्याही प्रकरणी भाग-भांडवल, कर्ज, थकहमीवरील कर्ज व कोणत्याही स्वरूपाचे आर्थिक सहाय्य देणार नाही.

३) अशा प्रकरणी वित्तीय संस्थांनी दिलेल्या कर्जास शासन आता अथवा भविष्यात कोणत्याही परिस्थितीत थकहमी देणार नाही.

४) वरीलप्रमाणे निश्चित प्रकल्प किंमतीप्रमाणे कारखान्यांनी त्यांचे स्वबळावर कारखाना उभारणी करावी.

५) अशा प्रकरणी विहीत परवानगी देण्यापूर्वी वरील अटी व शर्ती मान्य असल्याबाबतचे हमीपत्र घेण्यात येईल.

**०४.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्य www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१८०७१८११०३४२६३०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Deepak S Desai

Digitally signed by Deepak S Desai
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=CMT Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=4d11b2ee4dfa01facc6e58028a3bde93d4ac81d87ed6247ca0fb3a827602426f, cn=Deepak S Desai
Date: 2018.08.01 15:59:50 +05'30'

**(दिपक शि. देसाई)**
उप सचिव(साखर), महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) मा.मंत्री(सहकार), यांचे स्वीय सहायक,मंत्रालय, मुंबई/नागपूर.
२) मा.राज्यमंत्री(सहकार) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई/नागपूर.
३) प्रधान महालेखापाल (लेखापरिक्षण-१) लेखा व अनुज्ञेयता-१, मुंबई/नागपूर.
४) प्रधान महालेखापाल (लेखापरिक्षण-२) लेखा व अनुज्ञेयता-२, मुंबई/नागपूर.
५) अपर मुख्य सचिव(सहकार) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई/नागपूर.
६) अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य सहकारी बँक, मुंबई.
७) व्यवस्थापकीय संचालक, जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँका(सर्व).
८) साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य,शिवाजीनगर, पुणे.

९) प्रादेशिक सहसंचालक (साखर) सर्व विभाग.
१०) महासंचालक, वसंतदादा शुगर इन्स्टिटयुट, मांजरी, पुणे.
११) कार्यकारी संचालक, नॅशनल फेडरेशन ऑफ शुगर फॅक्टरी नवी दिल्ली
१२) वरीष्ठ उपाध्यक्ष, मिटकॉन, पुणे.
१३) सर्व जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था.
१४) सर्व सह/उप सचिव, अवर सचिव/कक्ष अधिकारी सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई/नागपूर.
१५) निवडनस्ती ३-स.